**सन २०२०-२१ राज्य योजनेंतर्गत महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६-A१८५) महाराष्ट्र बांबू विकास मंडळाकरिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. बांबूसा-२०२०/प्र.क्र.६०/फ-९**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- २३ ऑक्टोबर, २०२०

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०
३. महसूल व वन विभाग शासन निर्णय समक्रमांकित दिनांक २५.०६.२०२०
४. महसूल व वन विभाग, पत्र क्र.एमएफएस-२०२०/प्र.क्र.१/फ-२, दिनांक ०८.०९.२०२०
५. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/नबाप्र/प्र.क्र.४९(बांबू मंडळ)(१९-२०)/१६७/२०-२१, दिनांक १८.०९.२०२०
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.व्यसं/मबांविमं/प्र.क्र.२/६५६/२०-२१, दिनांक १३.१०.२०२०

**प्रस्तावना :-**

राज्य योजने अंतर्गत सन २०२०-२१ आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६-A१८५) या योजनेकरिता रु.५००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. तथापि, वित्त विभागाचे संदर्भ क्र.१ व २ चे परिपत्रक व शासन निर्णयानुसार तसेच या विभागाचे संदर्भ क्र.४ चे पत्रान्वये ३३% च्या मर्यादेत रु.३००.०० लक्ष इतक्या निधीस वित्त विभागाने सहमती दिलेली आहे. सदर योजनेंतर्गत संदर्भ क्र.३ चे शासन निर्णयान्वये ०१-वेतन - रु.१३.५० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांचेकडून संदर्भ क्र.५ व ६ अन्वये रुपये ३००.०० लक्ष अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केलेली आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने वित्त विभागाने ०१-वेतन- ५०%, ०२-मजुरी - ५०% आणि (१३-कार्यालयीन खर्च, १४-भाडेपट्टी व कर व २८-व्यावसायीक सेवा) २०% अनुदान वितरीत करण्यास सहमती दर्शविलेली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर यांनी संदर्भ क्र.५ व ६ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ व २ येथील परिपत्रक व शासन निर्णय तसेच या विभागाचे संदर्भ क्र.४ चे पत्र विचारात घेता प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६-A१८५) या योजनेमधून

महाराष्ट्र बांबू विकास मंडळ यांना खालील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार सन २०२०-२१ करीता **रु.१८४.५० लक्ष** इतका निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | कार्यालयाचे नांव | बाब | वितरीत करावयाची रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|---|
| १ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर | ०१-वेतन | ९९.०० |
| | | ०२-मजूरी | ६७.५० |
| | | १३- कार्यालयीन खर्च | १०.०० |
| | | १४-भाडेपट्टी व कर | २.०० |
| | | २८-व्यावसायिक सेवा | ६.०० |
| | | **एकूण :-** | **१८४.५०** |

उपरोक्त अनुदानाचा वापर करण्याच्या दृष्टीने (२४०६-A१८५) या लेखाशिर्षा अंतर्गत विहीत केलेल्या खालील अटी व शर्तीचे पालन करणे संबंधितावर बंधनकारक राहील.

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. संस्थेने आर्थिक वर्ष २०२०-२१ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
६. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
७. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

८. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.

१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२०, २६.०५.२०२० चे परिपत्रक व दि.४.५.२०२० चा शासन निर्णयातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक मागणी क्र.सी-७, ०१-वनिकरण प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, १०५ वनोत्पादने, (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन, (०१) (०८) महाराष्ट्र बांबू विकास मंडळाची स्थापना (२४०६ A१८५) या लेखा शिर्षाखाली सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२५०/ व्यय-१०, दिनांक २५.०९.२०२० अन्वये व वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२० चे परिपत्रक व वित्त विभागाच्या दि.०४.०५.२०२० चा शासन निर्णय तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२३१७१४४९२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2020.10.23 16:33:51 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

<u>प्रत :-</u>

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

६. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

७. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

८. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)